अभिमत विद्यापीठातील व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्तीचे सुत्र विहित करण्याकरीता तज्ञ समिती पूनर्गठीत करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
### उच्च व तंत्र शिक्षण विभाग
### शासन निर्णय क्र.सीटीसी-२०२०/प्र.क्र.२३/तांशि-४

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०७ डिसेंबर, २०२१.

**संदर्भ :-** १) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे क्रमांक ६९/२०२१ या जनहित याचिकेत दि.२० मार्च, २०१५ रोजीचे आदेश.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.सीटीसी-२०२०/प्र.क्र.२३/ तांशि-४, दि.१४ ऑक्टोबर, २०२१.
३) अध्यक्ष, शुल्क नियामक प्राधिकरण, मुंबई यांचे पत्र क्र.एफआरए/१०४४/ २०२१, दि.३० नोव्हेंबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

शासनाच्या प्रचलित शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेनुसार राज्यातील अभिमत विद्यापीठातील विद्यार्थ्यांना लाभ अनुज्ञेय करण्यासंदर्भात मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ येथे जनहित याचिका क्र.६९/२०११ दाखल करण्यात आली होती. या याचिकेत मा. न्यायालयाने दि.२० मार्च, २०१५ रोजी आदेश पारीत केले आहेत. सदर आदेशाच्या अंमलबजावणीसाठी राज्यातील अभिमत विद्यापीठांमध्ये प्रवेशित अभ्यासक्रमनिहाय/प्रवर्गनिहाय विद्यार्थी संख्या, त्यामधील विहित नियमानुसार पात्र ठरणाऱ्या शिष्यवृत्तीधारकांची संख्या, त्यासाठी येणारा वार्षिक अपेक्षित खर्च व शिष्यवृत्तीच्या खर्चापोटी शासनावर निर्माण होणारे आर्थिक दायित्व इ.बाबीमध्ये स्पष्टता असणे आवश्यक आहे. ही बाब विचारात घेता, मा. न्यायालयाने दि.२० मार्च, २०१५ रोजी पारीत केलेल्या आदेशानुसार राज्यातील अभिमत विद्यापीठांतील विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती योजना लागू करण्याच्यादृष्टीने शिष्यवृत्तीची अभ्यासक्रम निहाय रक्कम निश्चित करण्यासाठी एकसमान सुत्र विहित करुन शासनास शिफारस करण्यासाठी दि.१४ ऑक्टोबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये तज्ञ समिती गठीत करण्यात आली होती. तथापि, प्रशासकीय कारणास्तव या समितीचे पुनर्गठन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

१. अभिमत विद्यापीठातील व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्तीचे सुत्र विहित करण्याकरीता संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेली समिती या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

२. शासनाच्या सर्वसंबधित विभागाकडून ज्या शिष्यवृत्ती योजना अंमलात आहेत, अशा योजनांचा लाभ, विद्यापीठ अनुदान आयोग कायद्याच्या कलम ३ अन्वये स्थापीत राज्यातील अभिमत विद्यापीठांतील व्यावसायिक अभ्यासक्रमास प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांसाठी लागू करण्याकरीता प्रतिविद्यार्थी व प्रतीवर्षी शिष्यवृत्तीची अभ्यासक्रमनिहाय देय ठरणारी रक्कम निश्चित करण्यासाठी विशिष्ट सुत्र ठरविण्यासाठी खालीलप्रमाणे तज्ञ समिती पूनर्गठीत करण्यात येत आहे. :-

| अ.क्र. | समितीची संरचना | पदनाम |
|---|---|---|
| १. | श्री.एम.एन.गिलानी, निवृत्त न्यायमूर्ती, उच्च न्यायालय तथा माजी अध्यक्ष शुल्क नियामक प्राधिकरण, मुंबई. | अध्यक्ष |
| २. | श्री.संजय पानसे, सनदी लेखापाल, माजी सदस्य, शुल्क नियामक प्राधिकरण, मुंबई. | सदस्य |
| ३. | डॉ.आर.एस.माळी, निवृत्त कुलगुरु, कवयित्री बहिणाबाई चौधरी उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव तथा माजी सदस्य शुल्क नियामक प्राधिकरण, मुंबई. | सदस्य |
| ४. | संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, पुणे. | सदस्य |
| ५. | आयुक्त, वैद्यकीय शिक्षण संचालनालय, म.रा., मुंबई. | सदस्य |
| ६. | संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई. | सदस्य सचिव |

३. सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

१) मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ यांनी जनहित याचिका क्र.६९/२०११ मध्ये दिलेल्या दि.२० मार्च, २०१५ रोजीच्या आदेशानुसार राज्यातील अभिमत विद्यापीठातील व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या विविध विद्याशाखांमध्ये प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांना शासनाच्या सर्व संबधित विभागाव्दारे देण्यात येणाऱ्या शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेनुसार शिष्यवृत्ती अनुज्ञेय करण्यासंदर्भात सविस्तर विचारविनिमय करुन सर्वसमावेशक सुत्र विहित करणे.

२) राज्यातील अभिमत विद्यापीठातील व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या विविध विद्याशाखांमध्ये प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांना देय ठरणारी शिष्यवृत्तीची रक्कम दरवर्षी निश्चित करुन प्रदान करण्याबाबत कार्यपध्दती निश्चित करणे.

३) समितीने आपला अहवाल १५ दिवसात शासनास सादर करावा.

४. समितीचे अध्यक्ष व सदस्य यांना बैठकीकरीता रु.५,०००/- प्रति बैठक, रु.१,२००/- दैनंदिन भत्ता व मुक्कामी रु.७,५००/- लॉजिंग भत्ता अनुज्ञेय राहील. तसेच नियमानुसार विमानप्रवास भत्ता/ राजधानी, शताब्दी रेल्वे प्रवास भत्ता अनुज्ञेय राहील. सदरचा खर्च हा तंत्र शिक्षण संचालनालयाच्या स्वीय प्रपंजी लेख्यातून भागविण्यात यावा.

५. समितीच्या सर्व बैठकांचे आयोजन संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई येथील कार्यालयात करण्यात यावे.

६. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आलेला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११२०७१७२३०८३५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by NITIN JYOTINATH GHIRATKAR
Date: 2021.12.07 17:49:22 +05'30'

**(नि.ज्यो.घिरटकर)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४) श्री.एम.एन. गिलानी, निवृत्त न्यायमूर्ती, उच्च न्यायालय तथा अध्यक्ष, शुल्क नियामक प्राधिकरण, नागपूर*.
५) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण संचालनालय,म.रा.,मुंबई.
६) संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, पुणे.
७) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई.
८) डॉ.आर.एस.माळी, निवृत्त कुलगुरु, कवयित्री बहिणाबाई चौधरी उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव तथा माजी सदस्य, शुल्क नियामक प्राधिकरण, नाशिक*.
९) श्री.संजय पानसे, सनदी लेखापाल, माजी सदस्य शुल्क नियामक प्राधिकरण, मुंबई*.
१०) निवडनस्ती (तांशि-४).
*पत्राने.